**“उच्चदाब वितरण प्रणाली” योजनेअंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण वर्गवारीतील दि.३१.०३.२०१८ नंतरच्या कृषीपंप वीज जोडणी २०२० योजनेतील प्रलंबित कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता सन २०२३-२४ मध्ये रु.१०० कोटी निधी रोखीने वितरित करणेबाबत. (के-६, मुख्य लेखाशिर्ष-२८०१५५१६)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : उविप्र-२०१८/प्र.क्र.३०/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २६ मार्च, २०२४

**वाचा:-** १. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/प्र.क्र. ३०/ऊर्जा-५ /दि.०५.०५.२०१८
२. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र:संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७७/ ऊर्जा-३,दि.११.१२.२०१९
३. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
४. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/प्र.क्र. ३०/ऊर्जा-५/दि.१५.०९.२०२१
५. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: निधिवि-२०२२/उविप्र/प्र.क्र.१३/ऊर्जा-५/ दि.१६.०३.२०२२ व दि. २९.०३.२०२२
६. महावितरण कंपनी पत्र क्र. मु.अ/HVDS/Scheme Extension/२१८०६/दि.१८. ०७.२०२३
७. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/ प्र.क्र. ३०/ऊर्जा-५/ दि.२०.१०.२०२३
८. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३.
९. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/प्र.क्र.३०/ऊर्जा-५, दि.२८.१२.२०२३

**प्रस्तावना** :-

राज्यातील दि.३१.०३.२०१८ अखेर पैसे भरुन वीज जोडणी करिता प्रलंबित असलेल्या सुमारे २.२४ लाख कृषीपंपांना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे वीज जोडणी देण्याकरिता शासन निर्णय दि.०५.०५.२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या रु.५०४८.१३ कोटी इतक्या प्रकल्प खर्चास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागातील प्रलंबित कृषीपंपांना वीज जोडण्या देण्याकरिता रु.२२४८.०९ कोटी इतका निधी अनुदान स्वरुपात महावितरण कंपनीस वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उर्वरित महाराष्ट्रातील प्रलंबित कृषीपंप अर्जदारांसाठी वीज जोडणी देण्याकरिता येणारा खर्च रु.२८०० कोटी महावितरण कंपनी बँकांकडून कर्ज घेऊन उभारित आहे.

२. शासन निर्णय दि.१५.०९.२०२१ अन्वये उच्चदाब वितरण प्रणाली योजनेचा मूळ खर्च रु.५०४८.१३ कोटी वरुन रु.४७३४.६१ कोटी इतका सुधारीत करण्यात आला तसेच योजनेचा कालावधी मार्च २०२३ पर्यंत वाढविण्यात आला. त्यानंतर शासन निर्णय दि.२०.१०.२०२३ अन्वये उच्चदाब वितरण प्रणाली योजनेची दि.३१.०३.२०२३ रोजी पर्यंतची मुदत दि.३१.०३.२०२४ पर्यंत वाढवण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच योजनेअंतर्गत उर्वरीत अनुदान रक्कम विदर्भ व

मराठवाडा विभागातील सर्वसाधारण वर्गवारीतील दि.३१.०३.२०१८ नंतरच्या कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२० अंतर्गत प्रलंबित वीज जोडण्यांसाठी व त्याकरीता उभारण्यात येणाऱ्या उपकेंद्रांसाठी वापरण्यास मान्यता देण्यात आली आहे.

३. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता विदर्भ व मराठवाडा विभागातील प्रलंबित कृषीपंपांना वीज जोडणी देण्याकरिता लेखाशिर्ष क्र.२८०१५५१६ अंतर्गत रु.७०० कोटी इतकी मुळ तरतूद करण्यात आली असून सुधारित अंदाजात रू. ४९० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यामधुन रू. १४०.०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस शासन निर्णय दि. २८.१२.२०२३ अन्वये रोखीने वितरीत करण्यात आला आहे.उर्वरित निधीपैकी रु.१००.०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

(१) "उच्चदाब वितरण प्रणाली" योजनेअंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण वर्गवारीतील दि.३१.०३.२०१८ नंतरच्या कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२० अंतर्गत प्रलंबित वीज जोडण्यांसाठी व त्याकरीता उभारण्यात येणाऱ्या उपकेंद्रांसाठी रु.१००,००,००,०००/- (रुपये शंभर कोटी फक्त) इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(२) सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची दक्षता घ्यावी.

(३) सदर खर्च मागणी क्र.के-६ खाली, १९९ अशासकीय संस्थांना सहाय्य, (००)(०२) विदर्भ व मराठवाडा विभागातील कृषीपंपांना वीज जोडणी देणे (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष क्र.२८०१५५१६ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

(४) सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून डॉ.गौरी पाटील, कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ना.श्री.कराड, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रू.१००,००,००,०००/- (रुपये शंभर कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

(५) या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सर्शत असून,वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि.१२/०४/२०२३च्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(६) सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.६५/२०२४/व्यय-१६, दि.०५/०३/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार सदर निधी वितरित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२६१७०९४६०८१० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.03.26 17:25:57 +05'30'

**( ना. श्री. कराड )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा)यांचे सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (ऊर्जा) मंत्रालय, मुंबई-३२.
९. प्रधान सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१०.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१२.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१४.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१७.अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८.कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९.कार्यासन अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२
२०.कार्यासन अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१.निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२.ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.